शारीरिकदृष्ट्या अपंग व्यक्तींना शासकीय निमशासकीय सेवेत असलेल्या संवर्ग-३ व वर्ग-४ च्या पदांकरीता ३% आरक्षणाबाबतचा अनुशेष भरून काढण्याकरीता विशेष भरती मोहिम चालू करण्याबाबत.

- - - - - - - - - - - - - - - - - - - - -

महाराष्ट्र शासन
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक : आरपीएच-१०९६/प्र.क्र. ६५९/सुधार-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १ जानेवारी, १९९८.

वाचा :- १) शासन परिपत्रक क्रमांक:आरपीएच-१०९६/प्र.क्र.६५९/सुधार-२, दि. १९ मे, १९९७.

परिपत्रक :- शारीरिकदृष्ट्या अपंग अंध, मूकबधिर व अस्थिव्यंग असलेल्या व्यक्तीं-करीता शासनाने प्रत्येकी १% याप्रमाणे एकूण ३% जागा शासकीय /निमशासकीय कार्यालयातील वर्ग-३ व वर्ग-४ च्या पदांकरीता दि. २३ मे, १९७८ चे आदेशान्वये आरक्षित केलेल्या आहेत. त्याप्रमाणे मंत्रालयीन सर्व विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुखांना त्यांच्या अधिकार कक्षेत असलेल्या शासकीय / निमशासकीय /सार्व-जनिक उपक्रमाच्या कार्यालयात वर्ग-३ व वर्ग-४ या संवर्गातील पदांवर अपंगांच्या आरक्षणानुसार अपंग असलेल्या योग्य व्यक्तींना त्यांचे अपंगाच्या प्रमाणानुसार सेवेत सामावून घेण्याच्या दृष्टीने त्वरीत सूचना देण्यात याव्यात. अपंगांसाठी असलेले ३% आरक्षण हे एकूण संवर्गाच्या संख्याबळ [ Codre Strength ] ठरवून त्याप्रमाणे करण्यात यावे. अशा सूचना दि. १९ मे, १९९७ च्या परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत.

राज्यातील सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील सर्व शासकीय/ निमशासकीय / सार्वजनिक उपक्रम कार्यालय यासाठी राखीव ठेवलेल्या पदांवर अपंगांच्या नेमणुका त्वरीत करण्यात याव्यात असे वरील दि. १९ मे, १९९७ च्या परिपत्रकात नमूद केले आहे. तरी सुध्दा काही जिल्हाधिकाऱ्यांनी पाठविलेल्या माहितीनुसार अनेक कार्यालयांकडून अपंगांच्या रिक्त जागा भरण्याबाबत कार्यवाही केली जात नाही असे निदर्शनास आणून दिले आहे. यास्तव सर्व जिल्हाधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, ज्या कार्यालयांकडून अपंगांच्या रिक्त जागा भरण्याबाबत उचित कार्यवाही केली गेलेली नाही अशा कार्यालयांची माहिती त्या त्या

पृ.मा.प.

मंत्रालयीन विभाग प्रमुखांना तात्काळ पाठवावी. मंत्रालयीन विभाग प्रमुखांनी अशा प्रकरणामध्ये विशेष लक्ष देवून संबंधिताविरुध्द उचित कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

[ जे.पी. डांगे ]

सचिव,
समाजकल्याण

प्रति,

१] प्रबंधक, उच्च न्यायालय [ मूळ शाखा ], मुंबई.
२] प्रबंधक, उच्च न्यायालय [ अपील शाखा ], मुंबई.
३] प्रबंधक, लोकायुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
४] सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
५] सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६] सर्व जिल्हाधिकारी.
७] संचालक, सेवायोजन, नवी मुंबई.
८] संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९] सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
१०] सर्व मंत्रालयीन विभाग
११] निवड नस्ती / कार्यासन - सुधार-२.